सार्वजनिक आरोग्य विभागातील दिनांक ३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त होणाऱ्या वैद्यकीय अधिकारी व वरिष्ठ पदांवरील अधिकाऱ्यांचे (ग्रेड वेतन ५४००/- व वरील)सेवानिवृत्तीचे वय वाढविण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सेवानि १८१५/प्र.क्र. २१६ /सेवा २**

गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,दहावा मजला

मंत्रालय,मुंबई

दिनांक: ३० जून, २०१५

**संदर्भ : शासन निर्णय सा.आ.वि. क्रमांकः सेवानि १८१५/प्र.क्र. २१६ /सेवा २, दि.३०.५.२०१५**

**प्रस्तावना -**

राज्याच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडून आरोग्य सेवा संचालनालयाअंतर्गत सामान्य रूग्णालये,उपजिल्हा रूग्णालये,ग्रामीण रूग्णालये यामधून ग्रामीण भागातील गरजू रूग्णांना आरोग्य सुविधा पुरविण्यात येतात.तथापि,सदर रूग्णालयातील वैद्यकीय अधिकारी व वरीष्ठ अधिका-यांच्या कमतरतेमुळे रूग्णांना वेळेत योग्य आरोग्य सुविधा पुरविण्यास अडचणी निर्माण होत आहे. वैद्यकीय अधिकारी तसेच विशेषज्ञ पदासाठी प्रयत्न करून देखील पुरेशा प्रमाणात वैद्यकीय अधिकारी उपलब्ध होत नाहीत वा उपलब्ध झाल्यासही पसंतीच्या ठिकाणी पदस्थापना न मिळाल्यास सेवेत रूजू न होण्याचे प्रमाण मोठे आहे.परिणामी आरोग्य सेवतील पदे मोठया प्रमाणात रिक्त राहत असून त्याचा राज्यातील रूग्णसेवेवर विपरीत परिणाम होत आहे. ही बाब विचारात घेवून राज्यातील आरोग्य सेवा संचालनालयाअंतर्गत रूग्णालयातील दिनांक ३०.५.२०१५ रोजी नियत वयोमानाने सेवानिवृत्त होणाऱ्या एकूण ४१ (वेतनश्रेणी १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४०० व त्यावरील) वैद्यकीय अधिकारी व वरीष्ठ वैद्यकीय अधिकारी यांना सेवानिवृत्त न करता यांच्या बाबतीत मंत्रीमंडळासमोर वय वाढविण्याचा प्रस्ताव सादर करण्याच्या अधीन राहून त्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वरुन ६० वर्षे करण्याचा निर्णय संदर्भाधीन दिनांक ३०.५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. आता माहे जून,२०१५ मध्ये सेवानिवृत्त होणाऱ्या वरिष्ठ अधिकारी /वैद्यकीय अधिकारी (वेतनश्रेणी १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४०० व त्यावरील) यांचे सेवानिवृत्तीचे वय वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्याच्या सार्वजनिक आरोग्य विभागातील आरोग्य सेवा संचालनालयातील संचालक, आरोग्य सेवा,अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा,सहसंचालक,आरोग्य सेवा, उपसंचालक,आरोग्य सेवा, सहायक संचालक,आरोग्य सेवा तसेच महाराष्ट्र वैद्यकीय आरोग्य सेवा,गट-अ मधील जिल्हा शल्य चिकीत्सक संवर्ग,जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग, विशेषज्ञ व वैद्यकीय अधिकारी (ग्रेड वेतन रू.५४०० व त्यावरील ) पदावरील जे अधिकारी नियत वयोमानानुसार दि.३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त होत आहेत अशा सोबतच्या यादी क्र.१ व २ मधील ५ वरिष्ठ अधिकारी व ७ वैद्यकीय अधिकारी (वेतनश्रेणी १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४०० व त्यावरील) अधिकाऱ्यांची दि.३०.६.२०१५ रोजी जरी वयाची ५८ वर्षे पूर्ण होत असली तरी त्यांना दि.३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त न करता त्यांच्या बाबतीत मंत्रीमंडळासमोर वय वाढविण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून सेवानिवृत्तीचे वय ५८ वरून ६० वर्ष करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

राज्यातील आरोग्य सेवा संचालनालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कमतरतेच्या पार्श्वभूमीवर नियतवयोमान सेवानिवृत्तीचे वय वाढविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यामुळे वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेड वेतन ५४०० व

त्याहून अधिक ग्रेड वेतन घेणाऱ्या आरोग्य सेवा संचालनालयातील दिनांक ३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त होणाऱ्या वैद्यकीय अधिकारी व वरीष्ठ पदावरील अधिकारी वगळता अन्य अधिका-यांना हा शासन निर्णय लागू होणार नाही.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६८/१५ /सेवा-४ , दि. ३०.६.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५३०१९३९०२२३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.06.30 20:07:58 +05'30'

**(वि.पु.घोडके)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन
४) मा.मंत्री (आरोग्य)/मा.राज्यमंत्री(आरोग्य)यांचे खाजगी सचिव
५) उपसचिव (सा.प्र.वि.-१२) मंत्रालय,मुंबई -३२
६) उपसचिव (वित्त विभाग/ सेवा ४) मंत्रालय,मुंबई -३२
७) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
९) सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१०) उप संचालक आरोग्य सेवा,(सर्व)
११) जिल्हा शल्य चिकीत्सक ( सर्व )
१२) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व )
१३) महालेखापाल,( लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य -१ मुंबई / महाराष्ट्र राज्य-२ नागपूर
१४) महालेखापाल,( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य -१ मुंबई / महाराष्ट्र राज्य-२ नागपूर
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व )
१६) निवडनस्ती

| यादी क्र. १ | | | | |
|---|---|---|---|---|
| **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.सेवानि १८१५/प्र.क्र.२१६/सेवा २, दि.३० जून,२०१५** | | | | |
| महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वर्ग १) मधील दि.३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त होणाऱ्या अधिकाऱ्यांची यादी ( दि.३०/६/२०१५) **(वरिष्ठ पदे**) | | | | |
| १ | डॉ. रमेश चिमाजी चौगुले | १५/६/१९५७ | ३०/६/२०१५ | उपसंचालक, आरोग्य सेवा, खरेदी कक्ष, मुंबई |
| २ | डॉ.मोरेश्वर सुर्यकांत डांगे | १०/६/१९५७ | ३०/६/२०१५ | वैदयकीय अधिकारी (भिषक), जिल्हा रुग्णालय, चंद्रपूर |
| ३ | डॉ.मंचक तुळशीराम जाधव | १/७/१९५७ | ३०/६/२०१५ | बालरोगतज्ञ, स्त्री रुग्णालय, जालना |
| ४ | डॉ.शाम भास्कर अंधारे | २८/६/१९५७ | ३०/६/२०१५ | नेत्रशल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय, वर्धा |
| ५ | डॉ. रमेश हिरानंद खत्री | १२/६/१९५७ | ३०/६/२०१५ | जिल्हा क्षयरोग अधिकारी, वर्धा |

| यादी क्र. २ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.सेवानि १८१५/प्र.क्र.२१६/सेवा २, दि.३० जून,२०१५** | | | | | |
| महाराष्ट्र वैदयकीय व आरोग्य सेवा, गट अ (ग्रेड पे रु.५४००) मधील दिनांक ३०.६.२०१५ रोजी सेवानिवृत्त होणाऱ्या वैदयकीय अधिकाऱ्यांची यादी | | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अ. क्र. | वैदयकीय अधिकाऱ्यांचे नांव | पदस्थापना | मंडळ | जन्म दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
| १ | डॉ. एस.जी.स्वामी | वैदयकीय अधिकारी, प्रा.आ. केंद्र, खतगांव, जि. नांदेड | लातूर | २/६/१९५७ | ३०/६/२०१५ |
| २ | डॉ.जी.एस.देशमाने | वैदयकीय अधिकारी, प्रा.आ. केंद्र, बंबळी, जि. उस्मानाबाद | लातूर | २०/६/१९५७ | ३०/६/२०१५ |
| ३ | डॉ. एस. एम. डांगे | तालुका आरोग्य अधिकारी, उदगीर | लातूर | १/७/१९५७ | ३०/६/२०१५ |
| ४ | वैद्य एस.एच.जैस्वाल | सामान्य रुग्णालय, गोंदिया | नागपूर | १२/६/१९५७ | ३०/६/२०१५ |
| ५ | डॉ. एस. के. गल्हे | वैदयकीय अधिकारी, प्रा.आ. केंद्र, उंदीरगांव, जि. अहमदनगर | नाशिक | ६/६/१९५७ | ३०/६/२०१५ |
| ६ | डॉ.(श्रीमती) के. एच.श्रीवात्री (देशावरे) | वैदयकीय अधिकारी, प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे | मुंबई मंडळ, ठाणे | ४/६/१९५७ | ३०/६/२०१५ |
| ७ | डॉ. एम. ए.वाघमारे | वैदयकीय अधिकारी, प्रा.आ. केंद्र, तळेगांव दाभाडे, जि.पुणे | पुणे | १२/६/१९५७ | ३०/६/२०१५ |